चार कृषि विद्यापीठे आणि महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांना सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित तरतूदीच्या ८०% मर्यादेत अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : कृषिवि-३७१७/प्र. क्र.३९ /८-अे,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : ३१ मे, २०१७.**

**वाचा :-** १) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक - मफुकृवि-१७९९/प्र.क्र.१७४/२०-अे, दिनांक १८/१२/२०००,
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक - अर्थसं - २०१७/प्र.क्र.६८/अर्थसंकल्प-३, दिनांक ०१ एप्रिल, २०१७,
३) शासन निर्णय क्रमांक, कृषि व पदुम विभाग, लेखानु-२०१७/ (प्र.क्र. ४३/१७)/२-अे, दिनांक १३ एप्रिल, २०१७,
४) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक - कृषिवि-३७१७/प्र.क्र.३९/१७/८-अे, दिनांक २० एप्रिल, २०१७,
५) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक - अर्थसं - २०१७/प्र.क्र.७५/अर्थसंकल्प-३, दिनांक १८ एप्रिल, २०१७,
६) शासन निर्णय क्रमांक, कृषि व पदुम विभाग, अंदाज-२०१७/ (प्र.क्र. ४३/१७)/२-अे, दिनांक २७ एप्रिल, २०१७.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त शासन निर्णय दिनांक १८/१२/२००० अन्वये सन २०००-२००१ या आर्थिक वर्षापासून राज्यातील कृषि विद्यापीठांना योजनेतर अनुदान मंजूर करण्यासाठी सुधारित सहायक अनुदान सुत्र विहीत केले आहे. त्यानुसार राज्यातील चार कृषि विद्यापीठे आणि महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांना सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षाकरिता "२४१५ कृषि विषयक संशोधन व शिक्षण" या मुख्य लेखाशीर्षाखाली "०१ पीक संवर्धन", "०३ पशुसंवर्धन" व "०५ मत्स्यव्यवसाय" या उपशीर्षांतर्गत ०४ निवृत्तीवेतन विषयक खर्च, ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) व ३६ सहायक अनुदान (वेतन) या बाबींकरीता तसेच ६२१६, गृहनिर्माणासाठी कर्जे या मुख्य लेखाशीर्षाखाली ५५, कर्जे व आगाऊ रकमा या बाबीखाली सन २०१७-२०१८ मधील नऊमाहीकरीता अर्थसंकल्पित तरतूदीच्या ८०% मर्यादेत (लेखानुदान वगळून) सोबतच्या परिशिष्ट “अ” मधील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे मंजुर केलेले रु.५३५,९३,५६,०००/- (अक्षरी रुपये पाचशे पस्तीस कोटी त्र्यान्नव लाख, छप्पन्न हजार फक्त) इतके अनुदान खालील नमूद अटी व शर्तींच्या अधिन राहून वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे.

**अटी व शर्ती**

१) कृषि विद्यापीठांनी व कृषि परिषदेने उपलेखाशिर्ष / गट / योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील जी पदे / बाबी, योजनेतर योजना म्हणून पुढे चालू ठेवण्यास शासनाने मान्यता दिली आहे, त्या पदांचे वेतन व भत्ते आणि अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा. काही पदे रिक्त असल्यामुळे अथवा अन्य बाबी / कारणांमुळे एखाद्या योजनेखाली अनुदान अखर्चित

राहील्यास, सदर अनुदान पुढील महिन्यामध्ये वितरीत करण्यात येणा-या अनुदानामध्ये समायोजित करावे.

२) उपलेखाशिर्षनिहाय, गटनिहाय, योजनानिहाय व बाबनिहाय वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

३) उपलेखाशिर्षनिहाय मंजूर योजनांचे व त्या अंतर्गत मंजूर असलेल्या पदांचे सुधारित आकृतीबंधानुसार व्यवस्थितरित्या गटनिहाय वर्गीकरण केले आहे किंवा कसे याची कृषि परिषदेने / विद्यापीठाने सखोल तपासणी करावी. सदर वर्गीकरणामध्ये शासनाच्या मान्यतेशिवाय कोणतेही बदल करु नयेत.

४) प्रत्येक गटामधील वितरीत केलेले सहाय्यक अन महसूली उत्पन्न त्या गटातील अनुज्ञेय बाबींवरील खर्च भागविण्यासाठी आणि विकास कामे करण्यासाठी उपयोगात आणावे. एका गटाचे सहायक अनुदान आणि महसूली उत्पन्न दुस-या गटातील योजनां / बाबींसाठी वर्ग करु नये. एखाद्या गटातील योजनेसाठी जास्त सहायक अनुदान वितरीत झाले असेल तर, पुढील निधीची मागणी करताना सदर जास्तीचे अनुदान विचारात घेऊन तेवढ्या कमी व अनुज्ञेय निधीची मागणी करावी.

५) शासनाने मंजूर केलेल्या पदांपैकी जी पदे महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३ आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९० मधील तरतूदीप्रमाणे भरलेली आहेत व सदर पदे योजनेतर खर्चाने पुढे चालू ठेवण्यासाठी शासनाने मान्यता दिली आहे, अशा पदांच्या वेतन व भत्त्यांसाठीच विहीत अनुदान देय राहील.

६) प्रत्येक उपलेखाशीर्ष / गट/योजना आणि बाब निहाय स्वतंत्र लेखे / हिशोब ठेवावेत.

७) ज्या योजनांतर्गत / योजनेतर योजनांचा कालावधी संपलेला आहे, अशा योजना संबंधित कालावधीनंतर शासनाची मान्यता मिळाल्याशिवाय योजनेतर/योजनांतर्गत खर्चाने पुढे चालू ठेऊ नयेत.

८) महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेने, कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

९) शासनाने विद्यापीठाच्या काही नवीन योजनांना मान्यता देताना, सदर योजनेमधील पदे अंतर्गत समायोजनाने उपलब्ध करण्यास/भरण्यास मान्यता दिलेली आहे. यामुळे सदर नवीन योजनेसाठी नवीन पदे निर्माण झाल्यामुळे, ज्या योजनेतर / योजनांतर्गत मूळ योजनांमधील पदे अंतर्गत समायोजनाने नवीन योजनेकरिता वर्ग / उपलब्ध केली असतील, त्या मूळ योजनांमधील पदांचे वेतन व भत्यासाठी या आदेशान्वये वितरीत केलेला निधी खर्च करु नये. तसेच तिमाही अनुदानाची मागणी करताना, अशा पदांचे वेतन व भत्त्यासाठी लागणा-या निधीची मागणी करु नये.

१०) कृषि विद्यापीठांना त्यांचे महसूली उत्पन्न वापरण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. याबाबत विद्यापीठाने विहीत आदेश आणि कार्यपध्दतीनुसार उचित कार्यवाही करावी. तसेच महसूली उत्पन्न वाढविण्याच्या योजना राबविण्याबाबत कार्यवाही करावी.

११) विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिका-यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

१२) सन २०१७-२०१८ मधील अनुदानाची मागणी करताना, विद्यापीठाने दरमहा १० तारखेपर्यंत योजनानिहाय वितरीत केलेले अनुदान, प्रत्यक्ष खर्च आणि शिल्लक अनुदान याबाबतचा अहवाल सादर करावा. यापुढे अनुदानाची मागणी सादर करताना, पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानातील शिल्लकीची प्रस्तावित मागणीशी सांगड घालून, प्रत्यक्षात आवश्यक तेवढ्याच अनुदानाची मागणी करण्यात यावी.

१३) नियमबाह्य योजना पदे आणि बाबींसाठी खर्च करु नये.

१४) विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिका-यांनी उपरोक्त अटी व शर्तींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

१५) सोबतच्या परिशिष्ट "अ" मधील विवरणपत्रातील स्तंभ क्र. ४ मध्ये नमूद केल्याप्रमाणे उपविभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर, उपविभागीय कृषि अधिकारी, दापोली, उपविभागीय कृषि अधिकारी, अकोला, उपविभागीय कृषि अधिकारी, परभणी व संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, पुणे यांच्या नियंत्रणाखालील कार्यरत असलेले सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत स्तंभ क्र. ७ खाली मंजूर केलेले अनुदान शासन निर्णय क्रमांक कृषि व सहकार विभाग क्रमांक अेजीयु-१०७२/१८४७१/व्ही, दिनांक २७ सप्टेंबर १९७२ आणि शासन निर्णय क्रमांक कृषिवि- २००३/सीआर-३५/२०-अे, दिनांक २५/४/२००३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे कृषि विद्यापीठांचे नियंत्रक व सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

१६) या प्रित्यर्थचा खर्च सन २०१७-२०१८ च्या अंदाजपत्रकात सोबतचे परिशिष्ट "अ" मधील विवरणपत्रातील स्तंभ क्रमांक २ मध्ये नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

हे आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२ व १४४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार व वित्त विभागाने मंजुर केलेल्या अर्थसंकल्पीय अंदाज २०१७-१८ नुसार विभागाच्या स्तरावर निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६०१११०९२८५८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash Shankar Shete

Digitally signed by Prakash Shankar Shete
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=af336b9b5cf884e0df83ac0f426fe20d17c54caf7b5d1c87a713842aed4eda25, cn=Prakash Shankar Shete
Date: 2017.06.01 11:33:20 +05'30'

**(प्र. शं. शेटे)**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महासंचालक / सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,

२. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक/ संचालक (शिक्षण), महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी,
३. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक/ संचालक (शिक्षण), डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली,
४. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक/ संचालक (शिक्षण), वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी,
५. कुलसचिव / नियंत्रक / संचालक (शिक्षण), डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला,
६. उपविभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर / दापोली / अकोला / परभणी,
७. संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, पुणे-१,
८. सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे,
९. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर, जिल्हा अहमदनगर,
११. उपकोषागार अधिकारी, राहूरी, जिल्हा अहमदनगर,
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, दापोली, जिल्हा - रत्नागिरी,
१३. उपकोषागार अधिकारी, दापोली, जिल्हा - रत्नागिरी,
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला, जिल्हा अकोला,
१५. उपकोषागार अधिकारी, अकोला, जिल्हा अकोला,
१६. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी, जिल्हा परभणी,
१७. उपकोषागार अधिकारी, परभणी, जिल्हा परभणी,
१८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१९. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
२०. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
२१. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
२२. उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
२३. वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
२४. कक्ष अधिकारी, कार्यासन २अे / ६अे / ७अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
२५. कार्यासन ८-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

# परिशिष्ट – अ

**शासन निर्णय, कृषि व पदु विभाग क्रमांक : कृषिवि-३७१७/प्र. क्र.३९ /८-अे, दिनांक ३१/०५/२०१७ सोबतचे सहपत्र.**

(रुपये हजारात)

| अ. क्र. | लेखाशीर्ष | बाब | आहरण व संवितरण अधिकारी | सन २०१७-१८ करीता अर्थसंकल्पित तरतूद | माहे एप्रिल – मे, २०१७ करीता वितरीत केलेले लेखानुदान | ८०% मर्यादेत वितरीत करावयाचे उर्वरित अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. | ७ |
| | **अ) महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा – अहमदनगर.** | | | | | |
| ०१) | ०१ पीकसंवर्धन १२०, इतर संस्थांना सहाय्य (००) (०१) म.फु. कृ.वि. ला सहायक अनुदान (अनिवार्य) (२४१५ ००२५) | ०४, निवृत्तीवेतन विषयक खर्च | उपविभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर | १०६,३०,१३ | १७,७१,६९ | ६७,३२,४१ |
| | | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | | ११,७०,४५ | १,९५,०८ | ७,४१,२८ |
| | | ३६, सहायक अनुदाने (वेतन) | | १७२,२४,२१ | २८,७०,७० | १०९,०८,६७ |
| | | | **एकूण** | **२९०,२४,७९** | **४८,३७,४७** | **१८३,८२,३६** |
| ०२) | ०३ पशुसंवर्धन १२०, इतर संस्थांना सहाय्य (००)(०१) म.फु. कृ.वि. ला सहायक अनुदान (अनिवार्य (२४१५ ०१९७) | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | उपविभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर | १२,८४ | २,१४ | ८,१३ |
| | | ३६, सहायक अनुदाने (वेतन) | | २,९८,९३ | ४९,८२ | १,८९,३२ |
| | | | **एकूण** | **३,११,७७** | **५१,९६** | **१,९७,४५** |
| ०३) | **०१ पीकसंवर्धन** १२०, इतर संस्थांना सहाय्य (००) (१५) म.फु. कृ.वि. ला आर्थिकदृष्टया मागासवर्गीय विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक फी प्रतिपूर्तीसाठी सहायक अनुदान **(२४१५ ०९३८)** | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | उपविभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर | १३,००,०० | २,१६,६७ | ८,२३,३३ |
| | | | **एकूण** | **१३,००,००** | **२,१६,६७** | **८,२३,३३** |
| ०४) | **८० -सर्वसाधारण** १२० इतर संस्थांना सहाय्य (००)(०२) महात्मा फुले कृषि विद्यापीठाला कर्मचा-यांच्या अंशदानाच्या रकमेइतकी समतुल्य अंशदानाची रक्कम देण्यासाठी सहायक अनुदान (अनिवार्य) **(२४१५ १०२१)** | ०४, निवृत्तीवेतन विषयक खर्च | उपविभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर | ३,६२,७४ | ६०,४६ | २,२९,७३ |
| | | | **एकूण** | **३,६२,७४** | **६०,४६** | **२,२९,७३** |
| | **ब) डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ,दापोली, जिल्हा – रत्नागिरी.** | | | | | |
| ०५) | **०१ पीकसंवर्धन** १२०, इतर संस्थांना सहाय्य (००) (०२) डॉ. बा. सा. को. कृ. वि. ला सहायक अनुदान (अनिवार्य) **(२४१५ ००३४)** | ०४, निवृत्तीवेतन विषयक खर्च | उपविभागीय कृषि अधिकारी, दापोली | ३०,१२,७७ | ५,०२,१३ | १९,०८,०९ |
| | | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | | ३,६७,०० | ६१,१६ | २,३२,४४ |
| | | ३६, सहायक अनुदाने (वेतन) | | ६६,६२,६३ | ११,१०,४४ | ४२,१९,६६ |
| | | | **एकूण** | **१००,४२,४०** | **१६,७३,७३** | **६३,६०,१९** |

| अ. क्र. | लेखाशीर्ष | बाब | आहरण व संवितरण अधिकारी | सन २०१७-१८ करीता अर्थसंकल्पित तरतूद | माहे एप्रिल - मे, २०१७ करीता वितरीत केलेले लेखानुदान | ८०% मर्यादेत वितरीत करावयाचे उर्वरित अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. | ७ |
| ०६) | **०३ पशुसंवर्धन** १२०, इतर संस्थांना सहाय्य (००) (०२) डॉ. बा. सा. को. कृ. वि.ला सहायक अनुदान (अनिवार्य) **(२४१५ ०१७९)** | ०४, निवृत्तीवेतन विषयक खर्च | उपविभागीय कृषि अधिकारी, दापोली | २,५६,१८ | ४२,७० | १,६२,२४ |
| | | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | | ११,१४ | १,८५ | ७,०६ |
| | | ३६, सहायक अनुदाने (वेतन) | | १,०४,२७ | १७,३८ | ६६,०४ |
| | | | **एकूण** | **३,७१,५९** | **६१,९३** | **२,३५,३४** |
| ०७) | **०५ मत्स्यव्यवसाय** १२०, इतर संस्थांना सहाय्य (००) (०२) डॉ. बा. सा. को. कृ. वि. ला सहायक अनुदान (अनिवार्य) **(२४१५ ०२४१)** | ०४, निवृत्तीवेतन विषयक खर्च | उपविभागीय कृषि अधिकारी, दापोली | २,७१,८२ | ४५,३०, | १,७२,१६ |
| | | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | | ४३,४५ | ७,२४ | २७,५२ |
| | | ३६, सहायक अनुदाने (वेतन) | | ८,९३,९३ | १,४८,९९ | ५,६६,१५ |
| | | | **एकूण** | **१२,०९,२०** | **२,०१,५३** | **७,६५,८३** |
| ०८) | **०१ पीकसंवर्धन** १२०, इतर संस्थांना सहाय्य (००) (१६) डॉ.बा.सा.को.वि. ला आर्थिकदृष्टया मागासवर्गीय विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक फी प्रतिपूर्तीसाठी सहायक अनुदान **(२४१५ ०९४७)** | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | उपविभागीय कृषि अधिकारी, दापोली | ५,७३,०० | ९५,५० | ३,६२,९० |
| | | | एकूण | **५,७३,००** | **९५,५०** | **३,६२,९०** |
| ०९) | **८० -सर्वसाधारण** १२० ,इतर संस्थांना सहाय्य (००)(०१) डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठाला कर्मचा-यांच्या अंशदानाच्या रकमेइतकी समतुल्य अंशदानाची रक्कम देण्यासाठी सहायक अनुदान **(अनिवार्य) (२४१५ १०१२)** | ०४, निवृत्तीवेतन विषयक खर्च | उपविभागीय कृषि अधिकारी, दापोली | ३,१०,६० | ५१,७६ | १,९६,७२ |
| | | | **एकूण** | **३,१०,६०** | **५१,७६** | **१,९६,७२** |
| १०) | **६२१६, गृहनिर्माणासाठी कर्ज, ८०० - इतर कर्ज** (००) (०१) कृषि विद्यापीठांच्या कर्मचा-यांना घरबांधणी अग्रीम **(६२१६ ०२०१)** | ५५, कर्जे व आगाऊ रकमा | उपविभागीय कृषि अधिकारी, दापोली | **७६,४३** | **१२,७४** | **४८,४०** |
| | | | **एकूण** | **७६,४३** | **१२,७४** | **४८,४०** |
| **क)** | **डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला** | | | | | |
| ११) | **०१ पीकसंवर्धन** १२०, इतर संस्थांना सहाय्य (००) (०३) डॉ. पं. दे. कृ. वि. ला सहायक अनुदान (अनिवार्य) **(२४१५ ००४३)** | ०४, निवृत्तीवेतन विषयक खर्च | उपविभागीय कृषि अधिकारी, अकोला | ८९,०७,६६ | **१४,८४,६१** | **५६,४१,५२** |
| | | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | | १२,४२,२० | **२,०७,०३** | **७,८६,७३** |
| | | ३६ सहायक अनुदाने (वेतन) | | १२४,२५,१० | **२०,७०,८५** | **७८,६९,२३** |
| | | | **एकूण** | **२२५,७४,९६** | **३७,६२,४९** | **१४२,९७,४८** |

| अ. क्र. | लेखाशीर्ष | बाब | आहरण व संवितरण अधिकारी | सन २०१७-१८ करीता अर्थसंकल्पित तरतूद | माहे एप्रिल - मे, २०१७ करीता वितरीत केलेले लेखानुदान | ८०% मर्यादेत वितरीत करावयाचे उर्वरित अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. | ७ |
| १२) | **०५ मत्स्यव्यवसाय** १२०, इतर संस्थांना सहाय्य (००) (०३) डॉ. पं. दे. कृ. वि. ला सहायक अनुदान (अनिवार्य) **(२४१५ ०२६८)** | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | उपविभागीय कृषि अधिकारी, अकोला | १,२५ | **२१** | **७९** |
| | | ३६, सहायक अनुदाने (वेतन) | | ३४,६६ | **५,७८** | **२१,९५** |
| | | | **एकूण** | **३५,९१** | **५,९९** | **२२,७४** |
| १३) | **०१ पीकसंवर्धन** १२०, इतर संस्थांना सहाय्य (००) (१७) डॉ.पं.दे.कृ. वि. ला आर्थिकदृष्टया मागासवर्गीय विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक फी प्रतिपूर्तीसाठी सहायक अनुदान **(२४१५ ०९५६)** | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर | उपविभागीय कृषि अधिकारी, अकोला | **२,४०,००** | **४०,००** | **१,५२,००** |
| | | | **एकूण** | **२,४०,००** | **४०,००** | **१,५२,००** |
| १४) | **८० -सर्वसाधारण** १२०, इतर संस्थांना सहाय्य (००) (०५) डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठाला कर्मचा-यांच्या अंशदानाच्या रकमेइतकी समतुल्य अंशदानाची रक्कम देण्यासाठी सहायक अनुदान (अनिवार्य) **(२४१५ १०५९)** | ०४, निवृत्तीवेतन विषयक खर्च | उपविभागीय कृषि अधिकारी, अकोला | २,११,१४ | ३५,१९ | १,३३,७२ |
| | | | **एकूण** | **२,११,१४** | **३५,१९** | **१,३३,७२** |
| | **ड) वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी, जिल्हा - परभणी.** | | | | | |
| १५) | **०१ पीकसंवर्धन** १२०, इतर संस्थांना सहाय्य (००)(०४) म. कृ. वि. ला. सहायक अनुदान (अनिवार्य) **(२४१५ ००५२)** | ०४, निवृत्तीवेतन विषयक खर्च | उपविभागीय कृषि अधिकारी, परभणी | ५६,४६,५६ | ९,४१,०९ | ३५,७६,१६ |
| | | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | | ७,५७,६० | १,२६,२७ | ४,७९,८१ |
| | | ३६, सहायक अनुदाने (वेतन) | | ९४,८८,८७ | १५,८१,४८ | ६०,०९,६२ |
| | | | **एकूण** | **१५८,९३,०३** | **२६,४८,८४** | **१००,६५,५८** |
| १६) | **०३ पशुसंवर्धन** १२०, इतर संस्थांना सहाय्य (००(०४) म. कृ. वि. ला. सहायक अनुदान (अनिवार्य) **(२४१५ ०२०३)** | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | उपविभागीय कृषि अधिकारी, परभणी | ७,८३ | १,३१ | ४,९५ |
| | | ३६, सहायक अनुदाने (वेतन) | | १,८८,१७ | ३१,३६ | १,१९,१८ |
| | | | **एकूण** | **१,९६,००** | **३२,६७** | **१,२४,१३** |

| अ. क्र. | लेखाशीर्ष | बाब | आहरण व संवितरण अधिकारी | सन २०१७-१८ करीता अर्थसंकल्पित तरतूद | माहे एप्रिल - मे, २०१७ करीता वितरीत केलेले लेखानुदान | ८०% मर्यादेत वितरीत करावयाचे उर्वरित अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. | ७ |
| १७) | **०१ पीकसंवर्धन** १२०, इतर संस्थांना सहाय्य (००)(१८) व.ना.म.कृ.वि. ला आर्थिकदृष्टया मागासवर्गीय विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक फी प्रतिपूर्तीसाठी सहायक अनुदान **(२४१५ ०९६५)** | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | उपविभागीय कृषि अधिकारी, परभणी | ९,९९,०० | १,६६,५० | ६,३२,७० |
| | | | **एकूण** | **९,९९,००** | **१,६६,५०** | **६,३२,७०** |
| १८) | **८० -सर्वसाधारण** १२०, इतर संस्थांना सहाय्य (००) (०४) वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठाला कर्मचा-यांच्या अंशदानाच्या रकमेइतकी समतुल्य अंशदानाची रक्कम देण्यासाठी सहायक अनुदान (अनिवार्य) **(२४१५ १०४१)** | ०४, निवृत्तीवेतन विषयक खर्च | उपविभागीय कृषि अधिकारी, परभणी | ५,८६,१२ | ९७,६९ | ३,७१,२१ |
| | | | एकूण | **५,८६,१२** | **९७,६९** | **३,७१,२१** |
| **इ)महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.** | | | | | | |
| १९) | **०१ पीकसंवर्धन** १२०, इतर संस्थांना सहाय्य (००) (०५) महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेला सहायक अनुदान (अनिवार्य) **(२४१५ ००६१)** | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | **सहायक संचालक (लेखा-१) कृषि आयुक्तालय, पुणे** | १,०३,४० | १७,२३ | ६५,४९ |
| | | ३६, सहायक अनुदाने (वेतन) | | १,९९,३५ | ३३,२३ | १,२६,२५ |
| | | | | **३,०२,७५** | ५०,४६ | **१,९१,७४** |
| | | | **एकूण** | **८४६,२१,४३** | **१४१,०३,५८** | **५३५,९३,५६** |

-----